**५०% महागाई भत्त्याचे/महागाई वाढीचे सेवानिवृत्ति लाभांच्या प्रयोजनासाठी विलीनीकरण**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांकः सेनिवे १००४/१८५/सेवा-४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक २० जुलै २००४

## *निर्णय*

शासनाने असा निर्णय घेतला आहे की, **१ ऑगस्ट २००४ पासून सेवानिवृत्ती लाभांच्या प्रयोजनासाठी** मूळ वेतनाच्या ५०% एवढा महागाई भत्ता मूळ वेतनात विलीन करण्यात यावा आणि तो **"महागाई वेतन"** म्हणून स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावा.

२. शासनाने असाही निर्णय घेतला आहे की, विद्यमान निवृत्तिवेतनधारकांच्या बाबतीत, विद्यमान निवृत्तिवेतनाच्या ५० टक्के एवढया महागाई वाढीचे विलीनीकरण **१ ऑगस्ट २००४ पासून** निवृत्तिवेतनात करण्यात यावे आणि ते **"महागाई निवृत्तिवेतन"** म्हणून स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावे. महागाई निवृत्तिवेतनात विलीन करण्यात आलेली महागाई वाढ, महागाई वाढीच्या विद्यमान दरातून (६१%) कमी करण्यात यावी म्हणजेच १ ऑगस्ट २००४ पासून मूळ निवृत्तिवेतन/कुटुंबनिवृत्तिवेतन आणि महागाई निवृत्तिवेतन यांच्या एकूण रकमेवर ११% दराने महागाई वाढ देय राहील.

३. **१ ऑगस्ट २००४ ते ३१ मे २००५ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या** कर्मचाऱ्यांचे निवृत्तिवेतन निश्चित करताना कोणतीही हानी होऊ नये यादृष्टीने शासनाने असाही निर्णय घेतला आहे की, त्यांच्या प्रकरणी विशेष व्यवस्था म्हणून, १ ऑगस्ट २००४ पूर्वी त्यांनी अर्जित केलेल्या मूळ वेतनाच्या ५०% इतका महागाई भत्ता निवृत्तिवेतन परिगणित करण्याच्या प्रयोजनासाठी "मूळ वेतन" म्हणून समजण्यात यावा. परिणामी, महागाई निवृत्तिवेतनाचा भाग केवळ ३१ जुलै २००४ पर्यत सेवानिवृत्त झालेल्या/होणाऱ्या निवृत्तिवेतनधारकांच्याबाबतीत अस्तित्वात राहील.

४. सेवानिवृत्ती लाभांसाठी मूळ वेतनाच्या ५०% एवढा महागाई भत्ता "महागाई वेतन" म्हणून गणण्यात आल्यामुळे, निवृत्तिवेतन/कुटुंबनिवृत्तिवेतन हे, वेतन अधिक महागाई वेतनाच्या अनुक्रमे ५०% व ३०% इतके परिगणित केले जाईल व त्याची किमान मर्यादा रु. १९१३/- आणि कमाल मर्यादा राज्य शासनाकडील उच्चतम अनुज्ञेय वेतन अधिक महागाई वेतन यांच्या अनुक्रमे ५०% आणि ३०% अशी राहील. त्यामुळे शासन निर्णय, वित्त विभाग क्र. सेनिवे १०९९/३०२/सेवा -४, दिनांक १५ नोव्हेंबर १९९९ च्या परिच्छेद क्र. ६ व ८ मधील तरतुदी या मर्यादेपर्यत सुधारण्यात आल्या आहेत.

५. विद्यमान निवृत्तिवेतनधारक/कुटुंबनिवृत्तिवेतनधारकाना, यथास्थिती, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, मुंबई किंवा महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर यांच्या प्राधिकार पत्राशिवाय, वरील निर्णयानुसार (परिच्छेद २) निवृत्तिवेतन/कुटुंबनिवृत्तिवेतनाचे प्रदान करण्यासाठी सर्व निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकारी (म्हणजे यथास्थिती, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/कोषागार अधिकारी )यांना याव्दारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे, अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यांमधील निवृत्तिवेतनधारक / कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांना वरील निर्णय योग्य त्या फेरफारांसह लागू राहतील.

७. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की वरील निर्णय जिल्हा परिषदांचे निवृत्तिवेतनधारक / कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहतील.

रोटा प्रिंट/एच–538(13,000+40–7–04)1

८. यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदांत नमूद केलेल्या निवृत्तिवेतनधारकांची निवृत्तिवेतने ज्या अर्थसंकल्पीय शीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

९. या आदेशांची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**वसन्त वा.चौधरी,**
शासनाचे उप सचिव.

प्रति,
प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (५० प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १० प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व उपकोषागार अधिकारी

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,

सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.

**Merger of 50% Dearness Allowance/Dearness Relief for purpose of Retirement benefits.**

**Government of Maharashtra**
**Finance Department**
Resolution No. PEN 1004/185/SER 4
Mantralaya, Mumbai - 400 032, dated 20 July 2004.

***RESOLUTION***

Government is pleased to decide that, **with effect from 1st August 2004,** Dearness Allowance equal to 50% of the basic pay shall be merged with the basic pay and shown distinctly as **Dearness Pay (D.P.)** which would be counted for purpose of **retirement benefits.**

2. Government is further pleased to decide that in case of existing pensioners, Dearness Relief equal to 50% of the present pension will, with effect **from, 1st August 2004,** be merged with pension and shown distincly as **Dearness Pension.** Dearness Relief converted into Dearness Pension would be deducted from the existing rate of Dearness Relief (61%) i.e. Dearness Relief from 1 August 2004 would be payable at the rate of 11% on Basic Pension/family pension and Dearness pension/Dearness family pension.

3. With a view that **the employees retiring between 1st August 2004 to 31st May 2005** do not face any loss in fixation of pension, Government is also pleased to decide that as a special dispensation in their case, Dearness Allowance equal to 50% of the basic pay would be treated as basic pay for purposes of computation of pension in respect of basic pay received by them prior to 1st August 2004. Consequently, element of dearness pension will exist only for pensioners retired/retiring upto 31st July 2004.

4. Since 50% of Dearness Allowance equal to 50% of the Basic Pay converted into Dearness Pay is counted for retirement benefits, pension/family pension shall be calculated at 50% and 30% respectively, of 'Pay' plus 'Dearness pay' subject to minimum of Rs. 1913/- and maximum of 50% and 30% respectively of the highest Pay

plus Dearness Pay in the Government. Provisions contained in para 6 & 8 of Government Resolution, Finance department No. PEN 1099/302/SER 4 dated 15 November 1999, therefore, stand amended to this extent.

5. All Pension Disbursing Authorities (i.e. Pay & Accounts Officer, Mumbai/Treasury Officers, as the may be)are hereby authorised to pay Pension/Family Pension to existing pensioners/Family pensioners as per the above decisions (para 2)without any further authorisation from the Accountant General (A &E) - I Maharashtra, Mumbai or Accountant General (A &E) - II, Maharashtra, Nagpur, as the case may be.

6. Government is also pleased to direct that above decisions should, mutatis mutandis, apply to those pensioners including family pensioners of recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and Affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities to whom the pension scheme is made applicable.

7. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act, 1961 (Mah. V of 1962) and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decisions apply to the pensioners including family pensioners of Zilla Parishads.

8. The expenditure on this account should be debited to the Budget Heads to which the retirement benefits of the employees mentioned in the above paras are debited and should be met from the grants sanctioned thereunder.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**VASANT W. CHAUDHARI,**
Deputy Secretary to Government.

---

एच–538(13,000+40–7–04)2अ.